निलंबन कालावधी नियमित करण्याबाबत.
श्री. माणिक नामदेवराव अढाव, (सेवानिवृत्त)
सहाय्यक सरकारी अभियोक्ता

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन आदेश क्रमांक :- विभाचौ-२०१५/प्र.क्र.७३/पोल-१०,**
२ रा मजला, मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १३ डिसेंबर, २०१८

वाचा :- १. संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.सअनिलं/१२२/२६५/२०१४, दिनांक १२.०८.२०१४.
२. गृह विभाग, शासन आदेश क्रमांक डीपीपी-२०१४/प्र.क्र.२९१/पोल-१०, दिनांक ०२.०९.२०१४
३. गृह विभाग, शासन आदेश क्रमांक डीपीपी-२०१४/प्र.क्र.२९१/पोल-१०, दिनांक ०४.०५.२०१७
४. संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.सअविचौ/१२२/१३६/२०१७, दिनांक १९.०५.२०१७.
५. गृह विभाग, शासन आदेश क्रमांक विभाचौ-२०१५/प्र.क्र.७३/पोल-१० दिनांक ३१.०८.२०१८
६. संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.विचौ/५४/१९५९/२०१८, दिनांक २५.०९.२०१८.
७. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.प्ररजा-२०१५/प्र.क्र.२५/सेवा-६, दिनांक २५.०४.२०१७

# आदेश

ज्याअर्थी, श्री. माणिक नामदेवराव अढाव, ठाणे यांचे वर ॲन्टीकरप्शान ब्युरो, मुंबई येथे गुन्हा क्र.३७/०९ लाचलुचपत प्रतिबंधक अधिनियम १९८८ च्या कलम ७,१३(१)(ड) सह १३(२) अन्वये दिनांक १८.०७.२००९ रोजी गुन्हा दाखल झाला होता. त्याअनुषंगाने फौजदारी प्रकरण नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील न्यायालय क्रमांक ४६ येथे ए.सी.बी. स्पेशल केस नं.८९/२०१४, लाचलुचपत प्रतिबंधक अधिनियम १९८८ च्या कलम ७,१३(१)(ड) सह १३(२) दोषारोप दाखल करण्यात आले होते.

आणि ज्याअर्थी, श्री.माणिक नामदेवराव अढाव यांचे विरुध्द शासन आदेश क्रमांक विभाचौ-२०१२/प्र.क्र. २३५/पोल-१०, दिनांक ०१.०८.२०१४ अन्वये न्यायालयात अभियोग

दाखल करण्यास मंजूरी दिली होती. श्री.माणिक नामदेवराव अढाव यांना शासन आदेश क्रमांक डीपीपी-२०१४/प्र.क्र.२९१/पोल-१०, दिनांक ०२.०९.२०१४ च्या आदेशान्वये महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ मधील नियम ४ (१) (क) अन्वये प्रदान केलेल्या अधिकाराचा वापार करुन दिनांक ०१.०८.२०१४ पासून पूर्वलक्षी प्रभावाने तात्काळ निलंबित केले होते.

आणि ज्याअर्थी, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील न्यायालय क्रमांक ४६ येथे अे.सी.बी. स्पेशल केस नं.८९/२०१४ या खटल्याचा निकाल दिनांक २२.०१.२०१६ रोजी झाला असुन त्यात मा. न्यायालयाने श्री. माणिक नामदेवराव अढाव यांना निर्दोष मुक्त केले होते. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक निप्रआ-१११११/प्र.क्र.८६/११ अ, दिनांक १४.१०.२०११ च्या परिच्छेद ६ मधील तरतूदीच्या अनुषंगाने श्री. माणिक नामदेवराव अढाव, सहाय्यक सरकारी अभियोक्ता यांना शासन मान्यता घेऊन शासन आदेश दिनांक ०४.०५.२०१७ अन्वये ठाणे शहर येथे पुन:स्थापित करण्यात आले होते.

आणि ज्याअर्थी, श्री. माणिक नामदेवराव अढाव यांचेवरील नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील अे.सी.बी. स्पेशल केस नं.८९/२०१४ खटल्यात त्यांना मा. न्यायालयाने निर्दोष मुक्त केलेले असल्याने विधि व न्याय विभागाने सदरचा खटला मा. उच्च न्यायालय, मुंबई येथील अपील दाखल करण्यास योग्य नसल्याचा अभिप्राय दिलेला होते. त्यानुसार या प्रकरणी लाचलुचपत प्रतिबंधक विभागाने मा. उच्च न्यायालयात अपील दाखल न करण्याचा निर्णय घेतला होता.

आणि ज्याअर्थी, श्री. माणिक नामदेवराव अढाव, सहाय्यक सरकारी अभियोक्ता हे दिनांक ३१.०१.२०१८ रोजी नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त झालेले आहे. त्याअनुषंगाने यांच्याविरुध्द चालू असलेली विभागीय चौकशी "विभागीय चौकशी नियम पुस्तिका, १९९१ मधील नियम ४.७ (१) " नुसार संपुष्टात आणण्यात येऊन त्यानुसार दिनांक ३१.०८.२०१८ रोजी शासन आदेश निर्गमित करण्यात आले होते.

आणि ज्याअर्थी, श्री. माणिक नामदेवराव अढाव तत्कालीन सहाय्यक सरकारी अभियोक्ता यांनी शासनास दिनांक ३१.०८.२०१८ रोजी अन्वये त्यांचा निलंबन कालावधी कर्तव्य कालावधी म्हणून नियमित करण्यासंबंधीचा विनंती अर्ज दाखल केला होता. या प्रकरणी उपरोक्त नमूद संदर्भ क्रमांक ६ येथे नमूद वित्त विभाग, शासन निर्णयान्वये श्री. माणिक नामदेवराव अढाव यांचे "निलंबन असमर्थनीय" मानून त्याचा दिनांक ०१.०८.२०१४ ते ०५.०५.२०१७ हा "निलंबन कालावधी", महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर

सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम ७२ (१) (३) व (४) नुसार सर्व प्रयोजनार्थ "कर्तव्य काळ" म्हणून नियमित करण्याबाबत खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहेत.

(अ) महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन बडतर्फी आणि सेवेतून काढुन टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम १९८१ च्या नियम ७२ (१)(४) मधील तरतुदींनुसार श्री. माणिक नामदेवराव अढाव यांचा दिनांक ०१.०८.२०१४ ते ०५.०५.२०१७ निलंबन कालावधी सर्व प्रयोजनार्थ कर्तव्य कालावधी म्हणून नियमित करण्यात येत आहे.

(ब) महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निंलंबन बडतर्फी आणि सेवेतून काढुन टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम १९८१ च्या नियम ७२ (३) मधील तरतुदींनुसार श्री. माणिक नामदेवराव अढाव यांना उपरोक्त कालावधीत निर्वाह भत्यापोटी अदा करण्यात आलेली रक्कम त्यातून समायोजित करण्यात यावी.

(क) तसेच वित्त विभाग, शासन अधिसूचना क्रमांक सेनिवे-१००८/७७/सेवा-४, दिनांक ०१.११.२००८नुसार त्यांना विलंबाने प्रदान होणाऱ्या निवृत्ती वेतन व सेवा उपदानावरील व्याज आणि वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अरजा-१४९६/२०/सेवा-९, दिनांक २०.०६.१९९६ विलंबाने प्रदान होणाऱ्या रजा रोखीकरणावरील व्याज अदा करण्यास प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारानुसार मंजूरी देण्यात येत आहे.

सदरचे आदेश शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक प्ररजा-२०१५/प्र.क्र.२५/सेवा ६ दिनांक २५.०४.२०१७ नुसार प्रत्यायोजित करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२१३१४५६०११२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ce6f6edd7e1dfc6b4d6b65b7d93aa1a1dbcf0ec79c7c2143850ff6e8fdcb4c0d, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2018.12.13 15:04:26 +05'30'

**(किशोर शामराव भालेराव)**
उप सचिव (विधि), गृह विभाग,
महाराष्ट्र शासन

**प्रति :-**

श्री. माणिक नामदेवराव अढाव, तत्कालीन सहाय्यक सरकारी अभियोक्ता, ठाणे. (संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेमार्फत)

**प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव व विधी परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २, (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
४. संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता, मुंबई/ठाणे.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई/ठाणे.
७. निवडनस्ती/पोल-१०.